**उपसंचालक (माहिती), गट-अ या संवर्गात तदर्थ पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मावज-२०१३/७७७/प्र.क्र.२६१/३४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: ९ सप्टेंबर, २०१४

**आदेश**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/ जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ५०००) संवर्गात कार्यरत असलेल्या खालील अधिकाऱ्यांना उपसंचालक (माहिती), गट-अ ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ६६००) या पदावर खालील अटींच्या अधीन राहून सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांची रकाना (४) येथे त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. य. कि. भंडारे,<br>जिल्हा माहिती अधिकारी,<br>औरंगाबाद | अ.जा. | उपसंचालक, विभागीय माहिती कार्यालय, पुणे |

**अटी व शर्ती -**

१) वरील अधिकाऱ्यांना उपसंचालक (माहिती), गट-अ या पदावरील पदोन्नती ही मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती ही निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मिळणाऱ्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असून ती सरळसेवेचे उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा ११ महिन्यांकरीता, यापैकी जे अगोदर घडेल, त्या कालावधीपर्यंत असेल.

४) या तदर्थ पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१८५९०७३९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE
RAMKISAN
NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2014.09.09 18:53:25 +05'30'

**(रा.ना. मुसळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा), मुंबई/नागपूर,
५. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
७. संचालक (माहिती), नागपूर-अमरावती विभाग, नागपूर/ मराठवाडा विभाग, औरंगाबाद,
८. उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, पुणे,
९. जिल्हा माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय, पुणे/ औरंगाबाद,
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ औरंगाबाद,
११.निवडनस्ती.